**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

तारीख: १७ एप्रिल, २०१५

**वाचा:** - शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि. १० सप्टेंबर, २००१.

**परिपत्रक**

सर्व मंत्रालयीन विभागांना कळविण्यात येते की, **"महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१५"** (महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) अधिनियम, २०१५ यांच्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह) यास विधानमंडळाने मंजूरी दिली असून महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे, आणि ते २०१५ चा **महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १४** म्हणून **महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग ४**, दिनांक ९ एप्रिल, २०१५ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि. १० सप्टेंबर, २००१ अन्वये विहीत केल्यानुसार **नवीन पदे निर्माण करण्याच्या प्रस्तावास** वित्त विभागाची व योजनांतर्गत योजनेच्या बाबतीत नियोजन व वित्त विभागाची मान्यता प्राप्त झाल्यावर असे प्रस्ताव दि. १० सप्टेंबर, २००१ च्या शासन निर्णयाद्वारे स्थापन करण्यात आलेल्या उच्च स्तरीय सचिव समितीपुढे सादर करुन, समितीच्या मान्यतेनंतर आवश्यकतेनुसार काही प्रस्ताव मंत्रिमंडळापुढे ठेवण्यात यावेत. अशा प्रकारे उच्च स्तरीय सचिव समितीची व आवश्यक तिथे मंत्रिमंडळाची मान्यता असल्याशिवाय कोणतेही पद निर्माण करण्याचे आदेश काढू नयेत, असे मंत्रालयीन विभागांना कळविण्यात आले आहे. सन **२०१५-२०१६** च्या अर्थसंकल्पामध्ये काही नवीन बाबी अशा आहेत की, त्यामध्ये पदे निर्मितीचा खर्च अंतर्भूत आहे. ज्या पदांच्या निर्मितीपूर्वी प्रस्तावास मंत्रिमंडळाच्या मान्यतेची आवश्यकता आहे, अशी पदे निर्माण करण्यासाठी उच्च स्तरीय सचिव समितीची व आवश्यक तिथे मंत्रिमंडळाची मान्यता घेतली नसल्यास त्यासाठी नवीन बाबीव्दारे केलेली तरतूद वगळून राहिलेल्या रकमा **परि-४** मध्ये निर्देशित केल्याप्रमाणे मंत्रालयीन विभागांना त्यांच्या दुय्यम कार्यालयामध्ये वाटून देता येतील. नवीन पदांसाठी केलेली तरतूद नंतर मंत्रिमंडळाची मान्यता घेतल्यास दुय्यम कार्यालयाना वाटता येईल. तथापि असे प्रस्ताव मंत्रिमंडळाने अमान्य केल्यास याबाबतची तरतूद प्रत्यार्पित करुन गौणशिर्ष "राखीव" कडे घेण्यात यावी.

३. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, उपरोक्त परिच्छेदानुसार नवीन बाबीमध्ये समाविष्ट केलेल्या ज्या पदांच्या निर्मितीसाठी मंत्रिमंडळाच्या मान्यतेची आवश्यकता आहे ती पदे निर्माण करण्याचे आदेश त्यांनी मंत्रिमंडळाची मान्यता मिळाल्यानंतरच काढावेत.

४. वित्तीय वर्ष **२०१५-१६** च्या अर्थसंकल्पीय तरतूदींची मासिक निधी विवरणपत्रे अर्थसंकल्प अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यांनतर सन २०१५-१६ च्या प्रथम **आठमाहीकरीता** (नोव्हेंबर २०१५ अखेर) आवश्यक असणारा योजनेतर व योजनांतर्गत अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक **तरतूदीच्या ७० टक्केच्या मर्यादेत** सदर प्रणालीव्दारे (बीम्स) वितरीत केला जाईल. मात्र नियोजन विभागाचे अर्थसंकल्पीय अंदाज २०१५-१६ च्या खंड -१ मधील आमदार स्थानिक विकास कार्यक्रमाच्या निधीच्या तरतूदी व जिल्हा वार्षिक योजनेच्या तरतूदी तसेच सामाजिक न्याय व आदिवासी विकास विभागाच्या जिल्हा वार्षिक योजनेच्या तरतूदी १०० % वितरीत करण्यास सहमती राहील. सबब, त्याप्रमाणे निधी वितरीत करण्यात येत आहे.

५. मासिक विवरणपत्रानुसारचा निधी जून ते डिसेंबर या कालावधीमध्ये पुढे/मागे ओढून घेण्याची सुविधा अर्थसंकल्प अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर देण्यात येत आहे.

६. तथापि, अर्थसंकल्प अंदाज वितरण व संनियंत्रण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी सोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या बाबींसाठी तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्ती होत असल्यास विभागाने त्यांच्या स्तरावर निधी वितरीत करावा, अन्यथा अशा प्रस्तावास प्रशासकीय विभागांनी वित्त विभागाच्या व्यय शाखा व अर्थसंकल्प शाखा यांची मान्यता घेणे आवश्यक आहे.

**७. प्रशासकीय विभागांना वित्तीय अधिकार असतांनाही निधी वितरणाचे प्रस्ताव वित्त विभागाकडे संदर्भ केले जातात. यासंदर्भात अनेकदा संभ्रम निर्माण होतो. त्यामुळे वित्त विभागाकडे प्रस्ताव का संदर्भित केले जातात / जाणे आवश्यक आहे, याबाबत खालील प्रमाणे स्पष्टीकरण करण्यात येत आहे :-**

**अ) एखाद्या योजनेस / प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देणे — वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१ नुसार एक कोटी आवर्ती व पाच कोटी अनावर्ती योजनेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना आहेत. त्यापुढील अधिकार प्रशासकीय विभागांना नसल्याने असे प्रस्ताव वित्त विभागाला / नियोजन विभागाला मान्यतेसाठी सादर केले जातात. पद निर्मितीसाठी आवर्ती खर्च असल्यास अशा पदनिर्मितीसाठीही वित्त विभागाची / नियोजन विभागाची व उच्चाधिकार समितीची सहमती आवश्यक असते.**

**ब) अशा योजनांना प्रशासकीय मान्यता दिल्यानंतर सुध्दा अर्थसंकल्पिय तरतूद करणे आवश्यक असते. योजनांतर्गत प्रस्ताव असल्यास त्यासाठी नियतव्यय उपलब्धता व हा**

**नियतव्यय अर्थसंकल्पित करणे तर योजनेतर प्रस्ताव असल्यास आवश्यक ती बचत त्यासाठी उपलब्ध आहे किंवा कसे, ते स्पष्ट होणे आवश्यक असते.**

**क) एखादी योजना / प्रकल्पाच्या खर्चाच्या बाबीस प्रशासकीय मान्यता प्राप्त झाली असेल, तसेच खर्चासाठी तरतूद उपलब्ध असेल व खर्च मंजूरीचे विभागास वित्तीय अधिकार असल्यास परत वित्त विभागाची सहमती आवश्यक नाही. अन्यथा सहमती घ्यावी लागेल.**

८. प्रशासकीय विभागांना वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१ वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०//विनियम, दि.१५.०५.२००९ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागांना वेळोवळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांतर्गत असलेल्या प्रकरणांबाबत वित्त विभागाची वेगळयाने मान्यता घेण्याची आवश्यकता नाही. तसेच **सार्वजनिक बांधकाम विभाग व जलसंपदा विभाग यांना त्यांचे मॅन्युअलनुसार तसेच ही मॅन्युअल यथास्थिती सुधारीत केल्याप्रमाणे लागू असलेल्या विभागांना असे खर्चाचे अधिकार प्राप्त आहेत.** सदर शासन निर्णयातील नमूद बाबीं व्यतिरीक्त ज्या बाबींसाठी विभागांना विवक्षीतपणे वित्तीय अधिकार प्रत्यार्पित केले नसतील, अशा बाबींच्या संदर्भात वित्त विभागाची सहमती घेणे आवश्यक राहील. प्रशासकीय विभागांनी निधीबाबत महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या नियमांचे तसेच या परिपत्रकातील असलेल्या सूचनांचे पालन करावे.

९. विविध शासकीय/प्रशासकीय संस्थांना तसेच अनुदानित संस्थांना सहायक अनुदाने मंजूर करण्यापूर्वी त्यांचेकडून पूर्वी खर्च केलेल्या अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे विभागाने प्राप्त करावीत. तसेच ३ महिन्यापूर्वी दिलेल्या अनुदानाचा ७५% विनियोग पूर्ण झाल्याशिवाय पुढील अनुदान वितरीत करण्यात येऊ नये.

१०. विभागाद्वारे संक्षिप्त देयकाव्दारे निधी खर्च करण्यात येतो मात्र त्याचे तपशीलवार देयक सादर न केल्यामुळे लेखा आक्षेप येतात व अपहार संभवतात. तरी यापुढे विभागांनी त्याच लेखाशिर्षाखाली एक वर्षावरील जुने तपशीलवार देयक सादर केल्याशिवाय निधी वित्त विभागाच्या सहमतीशिवाय आहरित करु नये.

११. स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदाने वितरीत करण्यापूर्वी सदर संस्थांकडून राज्य शासनास येणे असणाऱ्या रकमांचा आढावा घेण्यात यावा, व त्या वसूल करुनच उर्वरित अनुदान वितरीत करण्यात यावे.

१२. वैयक्तिक लाभार्थीच्या योजनेची देयके आहरित करतांना लाभार्थ्यांची यादी निश्चीत करुन योग्य त्या तपशिलासह देयकासोबत जोडल्याशिवाय वैयक्तिक लाभार्थ्यांची अनुदाने आहरित करण्यात येऊ नयेत. शक्यतो अशा लाभार्थ्यांचे आधार क्रमांक पण नमूद करावेत.

१३. शिष्यवृत्ती / शिक्षणशुल्काची प्रतिपूर्ती, वैयक्तिक लाभार्थी यांची प्रदाने, इलेक्ट्रॉनिक्स क्लिअरन्स सिस्टीम (ECS) नेच अदा करण्यात यावीत. शक्यतो अशा सर्व बाबी आधार क्रमांकाशी निगडीत कराव्यात.

१४. बांधकाम विषयक प्रस्तावासंदर्भात प्रशासकीय मान्यता / तांत्रिक मान्यता तसेच आवश्यक तेथे सचिव समितीची मान्यता प्राप्त करुन घेतल्याशिवाय विभागाने खर्च करु नये. त्याचप्रमाणे हा निधी ठेव बांधकामाचे स्वरुपात सार्वजनिक बांधकाम विभागास प्रदान करु नये.

१५. दुय्यम कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमित करण्यापूर्वी अशा खरेदीसाठी रितसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढण्यात यावेत. प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढतांना अधिकाराची वित्तीय मर्यादा लक्षात घ्यावी. प्रशासकीय मान्यतेच्या आदेशात ही खरेदी का आवश्यक आहे हे स्पष्टपणे नमूद करावे. तसेच खरेदी करावयाच्या वस्तुचे Specification स्पष्टपणे नमूद करावेत.

तसेच थकित देयकांच्या प्रदानासाठी निधी दुय्यम कार्यालयाला उपलब्ध करुन देतांना **खरेदी केलेले साहित्य प्रत्यक्ष प्राप्त** झाल्याचे व त्याचे लेखे सुयोग्यरित्या ठेवल्याची खात्री पटल्याशिवाय तो निधी वितरीत करण्यात येऊ नये.

कोणत्याही खरेदी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी रुपये एक कोटी वरील खरेदी दर करारावर न करता स्पर्धात्मक निविदेद्वारे करावे. अशी खरेदी शक्य नसल्यास स्पर्धात्मक निविदेद्वारे व दर करारावर खरेदी आवश्यक असल्यास त्यासंदर्भात रितसर वित्त व यथास्थित नियोजन विभागाची सहमती घ्यावी. तसेच प्रशासकीय विभागाने कोणत्याही वस्तुंच्या खरेदीसंदर्भात विभागात होणाऱ्या एकूण खरेदीचा अंदाज घ्यावा. ही खरेदी जर वर्षभरात रुपये ५ कोटीच्या वर होत असेल तर त्यासंदर्भात स्पर्धात्मक निविदेद्वारे खरेदी करावी. स्पर्धात्मक निविदेद्वारे अशी खरेदी शक्य नसल्यास व दरकरारावर खरेदी आवश्यक असेल त्यासंदर्भात रितसर वित्त व यथास्थित नियोजन विभागाची सहमती घ्यावी.

१६. साहित्य खरेदीची प्रक्रिया पूर्ण करुन पुरवठादार निश्चित झाल्याशिवाय खरेदीची देयके कोषागारातून आहरित करण्यात येऊ नये. खरेदी विषयक रक्कम संबंधित पुरवठादाराच्याच नांवाने ECS द्वारे अदा करण्यात यावी. दरकरार /निवदेमध्ये विविक्षित तरतूद असल्याशिवाय पुरवठादारास अग्रिम अदा करण्यात येऊ नयेत.

१७. विविध करणांमुळे अखर्चित राहिलेला निधी विभागांनी त्यांच्या अधिनस्त महामंडळाकडे हस्तांतरीत करुन तांत्रिकदृष्टया खर्च झाल्याचे दाखविले जाते, ही एक गंभीर अनियमिता आहे याची विभागांनी नोंद घ्यावी. तसेच त्यांच्या अधिनस्त असलेला यापूर्वीचा अखर्चित निधी (स्वीय प्रपंजी खत्यातील / महामंडळाच्या खात्यातील वा इतर प्रकारे खर्च दर्शवून बाहेर ठेवण्यात आलेला) संपुर्णत: खर्च झाल्याशिवाय तरतुदी आहरीत वा वितरीत करु नये.

१८. विभागांमार्फत करण्यात येणारे संगणकीकरण संदर्भातील खर्च शासनाचे दरपत्रकानुसार / निविदाद्वारे करण्यात यावा. आवश्यक तेथे माहिती व तंत्रज्ञान विभागाची मान्यता घेण्यात यावी.

१९. वेतनविषयक खर्च वगळता उर्वरित बाबींचा खर्च आर्थिक वर्षाचे कालावधीत समप्रमाणात केला जात नाही असे निदर्शनास येते. निधी उपलब्ध असूनही प्रक्रियेअभावी तो खर्च करता येत नाही. परिणामी, बहुतांश तरतूदी वर्षभर अखर्चित राहतात व आर्थिक वर्षाचे अखेरचे कालावधीत पुरेशा तयारीशिवाय खर्च केला जातो. दरवर्षी २५% पेक्षा जास्त अर्थसंकल्पित तरतूद आर्थिक वर्षाच्या शेवटच्या महिन्यात खर्च झालेली दिसते. या सर्व बाबींमुळे वित्तीय शिस्तीचे पालन केले जात नाही. विकास योजनांची प्रगती राखली जात नाही. सन २०१५-१६ या वर्षासाठी विभागांच्या खर्चाचे प्रमाण योग्यरित्या नियोजित करण्यात यावे, याबाबतचा आढावा प्रशासनिक विभागांनी दर ३ महिन्यांनी सचिव स्तरावर घ्यावा व वर्षाच्या शेवटच्या महिन्यात प्रमाणाबाहेर खर्च होणार नाही याची दक्षता घ्यावी व तशा सूचना नियंत्रक अधिकाऱ्यांना द्याव्यात. याबाबत आर्थिक अनियमितता झाल्यास प्रशासकीय विभाग जबाबदार राहील.

२०. उपरोक्त अटी व शर्ती बरोबरच विभागांना सूचना देण्यात येते की, खर्च करतांना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली व सर्व अटी / शर्तींचे पालन करणे ही जबाबदारी विभागांची राहील. त्याचप्रमाणे विभागांकडे स्वीय प्रपंची लेख्या खाली बऱ्यांच मोठया प्रमाणावर निधी अखर्चित असल्याचे दिसून येते. सदर निधीचा ताळमेळ घालून व लेखा परिक्षण करुन सदर निधी जर खर्च करावयाचा नसल्यास शासनाच्या तिजोरीत परत करण्यात यावा.

निधी वितरीत करतांना मासिक निधी विवरणपत्रात (Cash Flow Statement) ज्या दरमहा खर्च रकमा दर्शविल्या आहेत त्याच्याशी सुसंगत असाव्यात.

२१. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४१८१२१५४७७८०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Narayan Bhosale

Digitally signed by Ashok Narayan Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=d40850c6db60734c4acd1f5455264095b6839b2fd94fa7c0ad1b12bcab7f8fbb, cn=Ashok Narayan Bhosale
Date: 2015.04.18 12:28:59 +05'30'

(अ. ना. भोसले)

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) सर्व अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग.

२) सर्व सह सचिव / उप सचिव ( अर्थसंकल्प शाखा ), सर्व मंत्रालयीन विभाग.

३) महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-एक महाराष्ट्र (VLC Section), मुंबई (२५प्रती)

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- दोन महाराष्ट्र (VLC Section), नागपूर (५प्रती)

६) महालेखापाल (लेखापरीक्षा)-एक, महाराष्ट्र, मुंबई. (१५ प्रती)

७) महालेखापाल (लेखापरीक्षा)-दोन, महाराष्ट्र, नागपूर. (५ प्रती)

८) अधिदान व लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई. (४० प्रती)

९) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई. (५ प्रती)

१०) कार्यासन अधिकारी-४, वित्त विभाग, (अर्थसंकल्प कक्ष) मंत्रालय, मुंबई.

११) सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२) वित्त विभागातील सर्व कार्यासने.

१३) निवड नस्ती, अर्थसंकल्प-३.

## महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१५

परिपत्रक क्र. अर्थसं-२०१५/प्र.क्र. ८५/अर्थ/३, दि. १७ एप्रिल, २०१५ सोबतचे “परिशिष्ट”.

| अ.क्र. | खर्चाचे स्वरुप | |
|---|---|---|
| १ | अर्थसंकल्पात समाविष्ट असलेला योजनांतर्गत खर्च | नवीन योजनेसाठी करावयाच्या खर्चास नियोजन व वित्त विभागाची सहमती आवश्यक. |
| २ | अर्थसंकल्पात समाविष्ट असलेला योजनेत्तर खर्च | नवीन बाबींसाठी वित्त विभागाची सहमती आवश्यक. |
| ३ | अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या योजनांतर्गत जुन्या योजनांचा खर्च | योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत असल्यास वित्त विभागाबरोबर नियोजन विभागाचीही सहमती आवश्यक. |
| ४ | अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या योजनेत्तर (Ongoing) चालु जुन्या योजनांचा खर्च | योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत असल्यास वित्त विभागाची सहमती आवश्यक. |
| ५ | अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या केंद्र पुरस्कृत बाहय सहाय्यित योजनांचा खर्च. | केंद्र पुरस्कृत योजनेसंदर्भात केंद्र शासनाकडून प्रत्यक्षात निधी प्राप्त झाल्याची खात्री केल्याशिवाय सदर निधी प्रत्यक्षात आहरित करण्यात येऊ नये. त्याचप्रमाणे ज्या योजनेत केंद्र शासनाच्या निधीसोबत राज्य शासनाचा समरुप हिस्सा यथोचित अर्थसंकल्पीत झाला असेल तो निधी राज्य शासनाच्या हिश्श्याच्या मर्यादेतच आहरित करावा. |
| ६ | शासनाच्या धोरणात्मक निर्णयानुसार राबविण्यात येणा-या विशेष स्वरुपाच्या योजना, (उदा. कर्जमाफी योजना, नुकसान भरपाईसाठी अर्थसहाय्य) अशा योजनांतर्गत बाबींवरील धारिका निधी वितरणासाठी स्वतंत्रपणे नियोजन विभागाकडे पाठवण्याची आवश्यकता नाही. | वित्त विभागाची सहमती आवश्यक. |
| ७ | तेराव्या / चौदाव्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार केलेल्या सर्व तरतूदी. | वित्त विभागाची सहमती आवश्यक. |
| ८ | ४५) व्याज प्रदाने.<br>५६) कर्जाची परतफेड. | राष्ट्रीय सहकार विकास निगम कडून प्राप्त झालेल्या कर्जावरील व्याज व परतफेडीची रक्कम संबंधित संस्थेकडून वसूल करावी, नसल्यास त्याबाबत वित्त विभागाची सहमती आवश्यक राहील. |
| ९ | योजनांतर्गत व योजनेत्तर तरतुदींपैकी खालील तपशीलवार शिर्षाचा खर्च. | **<u>तपासणी सूची :-</u>**<br>१) योजनेस प्रशासकीय मान्यता.<br>२) निधी वितरण शासन निर्णयातील अटी व शर्तीचे पुर्तता झाल्यानंतरच होणार आहे.<br>३) ३ महिन्यापूर्वी वितरीत केलेल्या निधीपैकी |
| | ३१) वेतनेत्तर सहायक अनुदाने | |
| | ३२) अंशदाने | |
| | ३३) अर्थसहाय्य | |

| | | |
|---|---|---|
| | ३५) भांडवली खर्चासाठी सहाय्यक अनुदाने | ७५% खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र. |
| | ५४) गुंतवणूका | ४) यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक / महालेखापाल यांच्याकडून कोणतेही गंभीर आक्षेप नाहीत. |
| | ५५) कर्जे व अग्रिम (७६१० शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे हा भाग वगळून) | ५) निधी लाभार्थ्याच्या थेट खात्यात जमा होणार आहे.<br>६) वस्तु खरेदी करण्यापूर्वी नियमित वापरात येणाऱ्या वस्तुंच्या बाबतीत त्याचे रितसर खरेदी नियोजन (procurement plan) करावे व अकारण शिल्लक साठा (inventary) असू नये.<br>७) भांडवली वस्तु खरेदी करण्यापूर्वी यापूर्वी खरेदी केलेल्या अशा वस्तुंची यथास्थित नोंद Dead Stock रजिस्टर मध्ये घेण्यात आली असून त्याचा योग्य वापर झाला असून त्या पडून नाहीत, असे प्रमाणपत्र.<br>८) यामधून खरेदी होणार असल्यास प्रत्यक्ष वस्तु प्राप्त झाल्यानंतरच संबंधितांना देयक अदा केले जाणार आहे.<br>९) आवश्यक त्या ठिकाणी आदिवासी / सामाजिक न्याय विभाग यांची निधी वितरणास सहमती आहे.<br>१०) प्रस्तुत योजनेत कोणतेही १ वर्ष जुने संक्षिप्त देयक त्याच लेखाशीर्षाखाली प्रलंबित नाही.<br>११) निधी स्वीय प्रपंची लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता खर्च केला जाणार आहे.<br>वरील अटींची तसेच उक्त शासन निर्णयातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची पुर्तता होत असल्यास प्रशासकीय विभागाने त्यांच्या स्तरावर निधी वितरीत करावा व निधी वितरीत करणाऱ्या आदेशामध्ये वरील प्रत्येक अटीची पुर्तता झाली आहे, असे प्रमाणपत्र देऊन आदेश निर्गमित करावेत, अन्यथा प्रस्ताव आवश्यक त्या ठिकाणी नियोजन / वित्त विभागाला सहमतीसाठी सादर करावेत. |